**विस्तार सुधारणा अंतर्गत** शंकररावजी चव्हाण विष्णुपुरी प्रकल्प असरजन येथील उध्दरण नलिका व घटक भागांची यांत्रिकी दुरुस्ती कामाचे विशेष दुरुस्ती अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळणे बाबत.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रमा २०१४/( ४३९/१४)/ सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई

तारीख: २१/०८/२०१४

वाचा

**कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्रमांक गोमपाविम/तां.२/ १४/२०१४/ ६६५० दि. ६.८.२०१४**

प्रस्तावना

शंकररावजी चव्हाण विष्णुपूरी प्रकल्पाचे बांधकाम सन १९८८ साली पूर्ण झाले प्रकल्पातर्गत बंधारा, पंपगृह, ८५० अश्वशक्तीचे १४ पंप, १६०० मी मी व्यासाचे उध्दरणनलिका, जलकुंभ कालवे वितरीका इ बाबीची कामे पूर्ण झाली आहे. प्रकल्पाचे लाभक्षेत्र २८३४० हे. असून जून २०१४ अखेर निर्मित सिंचन क्षमता १९६३०हे.एवढी आहे. सदर बंधाऱ्यास एकूण १८ दरवाजे असून दरवर्षी पावसाळयात दरवाजे टाकून नदीपात्रात जलसाठा करण्यात येतो. सदर प्रकल्पाची साठवणक्षमता ८३.५५ दलघमी एवढा असून मागील१५ वर्षापासून प्रकल्पावर सिंचन कार्यक्रम राबविण्यात येत आहे. हा प्रकल्प नांदेड शहराजवळ असल्यामुळे पिण्याच्या पाण्यासाठी व औद्योगिक वापरसाठी या प्रकल्पात ४२ दलघमी पाणी आरक्षित करावे लागते. सिंचन /बिगर सिंचन पाणी पुरवठा पुरेसा व वेळेवर करण्यासाठी विष्णुपुरी प्रकल्पाची सर्व यांत्रिकी व विद्युत यंत्रणा सदैव सुव्यवस्थीत राहणे आवश्यक आहे. सदर प्रकल्प सुरु झाल्यापासून देखभाल व दुरुस्ती अंतर्गत प्रकल्पास दरवर्षी ४० ते ५०लक्ष एवढा निधी प्राप्त होत आहे. या अत्यल्प अनुदानातून यांत्रिकी व विद्युत घटक दुरुस्तीसाठी पुरेसा निधी उपलब्ध होत नाही त्यामुळे सदर प्रकल्पाची यांत्रिकी व विद्युत विभागाची आपत्ककालीन व्यवस्था सुरळीत राहत नाही.सदर प्रकल्प पूर्ण होऊन २५ वर्षे झाली आहेत. उध्दरण नलिकांचे विशेष दुरुस्तीची अंत्यत आवश्यकता आहे कारण पंपाव्दारे उचलण्यात येणारे पाणी जलकुंभ वितरीकेपर्यत नेण्यासाठी प्रकल्पावर १.६० मी व्यासाच्या व ३.८ किमी लांबीच्या ३ उध्दरण नलिका आहेत उध्दरण नलिकेच्या प्रत्येक

रांगेस ४ पंप जोडण्यात आले आहे. याप्रमाणे प्रत्येक रांगेचा विसर्ग ३८८० लिटर प्रती सेकंद इतका आहे. पंप सुरु झाल्यावर उध्दरण नलिका मागेपुढे सरकते त्याकरिता उध्दरण नलिका रोलर्स सपोर्ट गहाळ किंवा चोरी होण्याचे प्रमाण वाढलेले आहे त्यामुळे त्याठिकाणी उध्दरण नलिका खाली किंवा एका बाजूला सरकली आहे. प्रसरण सांध्यामध्ये अंतर वाढल्यामुळे मोठया प्रमाणात पाण्याची गळती होते व त्याचा पाणी आवर्तनावर मोठा परिणाम होतो. उध्दरण नलिकेची दुरुस्ती कामे ही करणे आवश्यक आहे. यांत्रिकी व विद्युत घटक बाबीची तसेच उदभरण नलिकाचे विशेष दुरुस्तीचे कामे करणे अंत्यत आवश्यक आहे. सदर बाब विचारात घेऊन विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयाव्दारे विष्णुपुरी प्रकल्प असरजन येथील उध्दरण नलिका व घटक भागांची यांत्रिकी दुरुस्ती कामाचे विशेष दुरुस्ती रु. ३३०.५८ लक्ष (कामावरील खर्च रु.३००.५३ लक्ष व रु ३०.०५ लक्ष अनुषंगिक खर्च) च्या खर्चास खालील अटीच्या अधीन राहुन सोबतच्या परिशिष्टा प्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे

१)शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/०९)/मो.प्र-२, दि.१५.०१.२०१० मधील अटींच्या अधिन राहून कामांची दुरुस्ती करण्यात यावी

२)सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

३) प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे. ही कामे करण्याकरीता भौतिक व आर्थीक नियोजन करुन कार्यपूर्ततीबाबत विविध टप्यांचे दिनांकासहीत (miles stones) निर्धारित करण्यात यावे. सदर दिनांकानुसार miles stone साध्य करणे अपेक्षित असून जर त्यात दिरंगाई झाल्यास दंड (Penalty) आकारण्याची व लवकर साध्य झाल्यास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी

४) विशेष दुरुस्तीचे काम यांत्रिकी /विद्युत विभागाकडून करुन घेण्यात यावे

५) काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे पुर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Completion Report & Certificate) शासनास सादर करावे

६) दरसूची बाहय बाबीचे दर सक्षम स्तरावर मंजूरी घेवून तांत्रिक मान्यता प्रस्ताव मंजुर करण्यात यावा.

या कामावर होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा यासाठी भाग भांडवली अंशदान( ११ )(०२) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास( ४७०१ जे १४९) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र ३५ सन २०१४-१५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे..

हा शासन निर्णय (वित्त विभाग) क्र विअप्र १०.०८/प्रक्र ७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ मधील भाग- पहिला उपविभाग -३ मधील अ.क्र.४ २७ (२) मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२२१०५१३१३५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.08.22 10:49:37 +05'30'

**(कि.ल.संखे)**

**शासनाचे कक्ष अधिकारी**

प्रत,

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई

४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
१०.स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११.स्वीय सहायक, प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
१३.मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.मुख्य अभियंता, (यांत्रिकी) जलसंपदा विभाग, नाशिक
१५. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद
१६.आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१८.उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९.अधीक्षक अभियंता , नांदेड पाटबंधारे मंडळ, नांदेड
२०.अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ(व्दारे), पुणे- १
२१.अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२.कार्यकारी अभियंता, मुख्य व्दार उभारणी पथक क्र ५, नाशिक
२३.उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४.ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
२५.सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक प्रमा २०१४/( ४३९ /१४)/ सिंव्य(कामे) दिनांक २१. ८.२०१४ चे प्रपत्र

**परिशीष्ट**

| अ.क्र | बाब | अंदाजीत खर्च (लक्ष रुपये ) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १) | विष्णुपुरी प्रकल्पातील उध्दरण नलिका( ३ नग) देखभाल व दुरुस्ती | ३००.५३ |
| २ | अनुषंगिक खर्च १० टक्के | ३०.०५ |
| | एकुण | ३३०.५८ |

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.08.22 10:50:10 +05'30'

(कि.ल.संखे)

शासनाचे कक्ष अधिकारी